**अधीक्षक अभियंता, बुलडाणा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, बुलडाणा यांच्या अधिपत्याखालील जिगांव प्रकल्प पुनर्वसन उपविभाग क्र.१ शेगांव या उपविभागातील नियत अस्थायी आस्थापनेवरील पदांना दि.०१/०९/२०२१ ते दि. २८/०२/२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक- मुदतवाढ -२०२१/८६४/प्र.क्र.२१२/मोप्र-२,**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक :- २९/०३/२०२३

**संदर्भ** - १) जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्रमांक- मुदतवाढ २०२१/१२५/प्र.क्र.३६/ मोप्र-२, दि.२६/०३/२०२१

२) सहायक अधीक्षक अभियंता, बु.पा.प्र.मं.बुलडाणा यांचे जा.क्र.७६३/आस्था-२/मुदतवाढ प्रस्ताव/२०२३, दि१७/०२/२०२३.

३) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक पदनि २०१६/प्रक्र.८/१६/ आ.पु.क, दि.१०/०८/२०२१

४) शासन निर्णय, जलसंपदा विभाग क्रमांक आढावा २००२ (३३५/२००२)/आ (प्रशि), दि.०६/०२/२००३

५) शासन निर्णय क्रमांक- मुदतवाढ -२०२१/८६४/प्र.क्र.२१२/मोप्र-२, १९.०४.२०२२.

**प्रस्तावना :-**

अधीक्षक अभियंता, बुलडाणा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, बुलडाणा यांच्या अधिपत्याखालील अधिनस्त असलेल्या क्षेत्रिय आस्थापनेवरील सर्व पदांची निर्मिती सुधारीत आकृतीबंधानुसार संदर्भाधिन क्रमांक ४ येथील शासन निर्णय दिनांक ०६/०२/२००३ अन्वये निश्चित करण्यात आली आहे. अधीक्षक अभियंता, बुलडाणा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, बुलडाणा यांच्या अधिनस्त असलेल्या क्षेत्रिय आस्थापनेवरील कार्यालयांना नियत अस्थायी आस्थापनेवरील ४२७ पदांना व रुपांतरीत अस्थायी ४ पदांना दिनांक २८/०२/२०२१ पर्यंत चालू ठेवण्यास संदर्भीय क्र.१ च्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली होती. तद्नंतर दि.१९.०४.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये अधिनस्त असलेल्या जिगांव प्रकल्प पुनर्वसन उपविभाग क्र.१ शेगांव या उपविभागातील नियत अस्थायी आस्थापनेवरील १८ पदे वगळून ४०९ पदांना दि.२८.०२.२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती.

सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतिबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात सर्व अस्थायी पदांना दिनांक ३१/०८/२०२१ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आले होते. तथापी सर्व प्रशासकीय

विभागांची सुधारीत आकृतिबंध निश्चित करण्याबाबतची कार्यवाही अद्याप पूर्ण झालेली नाही. ही बाब विचारात घेऊन दिनांक ०१/०९/२०२१ ते दिनांक २८/०२/२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार संदर्भ क्रमांक ३ चे शासन निर्णयानुसार देण्यात आले आहेत.

**शासन निर्णय :-** सहायक अधीक्षक अभियंता, बुलडाणा पाटबंधारे प्रकल्प मंडळाच्या संदर्भीय क्र. २ च्या प्रस्तावास अनुसरुन अधीक्षक अभियंता, बुलडाणा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, बुलडाणा यांच्या अधिपत्याखालील जिगांव प्रकल्प पुनर्वसन उपविभाग क्र.१ शेगांव या उपविभागातील नियत अस्थायी आस्थापने वरील परिशिष्ट अ मध्ये दर्शविलेल्या १८ अस्थायी पदांना दिनांक ०१/०९/२०२१ ते दिनांक २८/०२/२०२२ पर्यंत चालू ठेवण्यास खालील अटींच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे.

| कार्यालयाचे नांव | नि.अ.आस्थापना |
|---|---|
| १)जिगांव प्रकल्प पुनर्वसन उपविभाग क्र.१, शेगांव | १८ पदे |
| एकूण | १८ पदे |

१) उपरोक्त सर्व पदे विभागाने प्रस्तावित केलेल्या कालावधीत कार्यरत असतील.

२) रुपांतरीत आस्थापनेवरील पदे, त्या पदावर कर्मचारी कार्यरत असेपर्यंतच चालू राहील.

३) ही पदे आकृतीबंधानुसार मंजूर असतील व सहा महिन्याहून अधिक कालावधीसाठी रिक्त नसतील.

सदर पदांवरील वेतनाचा खर्च, मागणी क्रमांक आय-५, मुख्य लेखाशीर्ष-४७०१ मोठे व मध्यम पाटबंधाऱ्यावरील भांडवली खर्च, ८० सर्वसाधारण (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका (०४) विविध पाटबंधारे विकास महामंडळांना भाग भांडवली अंशदान (वेतन) (०४(०२) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (अनिवार्य) (४७०१ आय १७१) या लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/ आ.पु.क., दिनांक १० ऑगस्ट २०२१ अन्वये विभागास दिलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यांत येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०४१२१५५२००१७२७ असा आहे. हा कार्यालयीन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ABHAY KESHAORAO YEDSIKAR

Digitally signed by ABHAY KESHAORAO YEDSIKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT,
2.5.4.20=5724dd2e45895f7c2ab554c8d0b0041f388e5f397467c37bb907e6cc635bd0fd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5B9CED1C6530163B6C7A287499C459AF544860D5330D82DBE50D22D67820C373, cn=ABHAY KESHAORAO YEDSIKAR
Date: 2023.04.12 15:57:14 +05'30'

**सहपत्र-परिशिष्ट अ.**

**( अभय येडसीकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत-सहपत्रासह-**

१) महालेखापाल २, महाराष्ट्र राज्य, (लेखा व अनुज्ञेयता) नागपूर,

२) महालेखापाल २, महाराष्ट्र राज्य, (लेखापरीक्षा) नागपूर,

३) वित्त विभाग, व्यय-१२, मंत्रालय, मुंबई,

४) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ,नागपूर

५) अधीक्षक अभियंता, बुलडाणा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, बुलडाणा यांना कळविण्यात येते की, प्रस्तुत शासन निर्णयान्वये मंजूरी दिलेल्या अधिकारी/कर्मचारी यांच्या व्यतिरिक्त इतर अधिकारी/कर्मचारी यांची वेतन व देयके अदा केल्यास तसेच या निर्णयान्वये दिलेल्या मंजूरीच्या प्रत्यक्ष/अप्रत्यक्षरित्या चुकीचा अर्थ लावून अन्य अधिकारी/कर्मचारी यांची वेतन देयके अदा केल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी आहरण व संवितरण अधिकाऱ्यांवर राहील, त्याचप्रमाणे प्रस्तावात नमूद लेखाशिर्ष हे जुने असल्याने शासन निर्णयात सुधारण्यात आलेले आहे. भविष्यात प्रस्ताव पाठविताना याची नोंद घेण्यात यावी.

६) कार्यकारी अभियंता, खडकपूर्णा प्रकल्प विभाग, देऊळगाव राजा.

७) कार्यकारी अभियंता, जिगांव प्रकल्प पुनर्वसन विभाग, खामगाव

८) कार्यकारी अभियंता, जिगांव प्रकल्प धरण व पुनर्वसन विभाग, शेगांव

९) मोप्र-(२) कार्यासन, संग्रहार्थ.

| परिशिष्ट अ | | | | |
|---|---|---|---|---|
| शासन निर्णय क्रमांक मुदतवाढ २०२१/८६४/प्र.क्र.२१२/मोप्र-२, दिनांक २९/०३/२०२३ चे सहपत्र दिनांक ०१/०९/२०२१ ते २८/०२/२०२२ साठी नियत अस्थायी आस्थापनेवरील १८ पदे | | | | |
| अ.क्र. | कार्यालयाचे नाव | पदनाम | | एकूण पदसंख्या |
| १ | **जिगांव प्रकल्प पुनर्वसन उपविभाग क्र.१, शेगांव** | १ | उपविभागीय अभियंता | १ |
| | | २ | कनिष्ठ अभियंता/ शा. अ. /स. अ. श्रेणी-२ | ४ |
| | | ३ | वरिष्ठ लिपीक | १ |
| | | ४ | कनिष्ठ लिपिक | २ |
| | | ५ | अनुरेखक | १ |
| | | ६ | टंकलेखक | १ |
| | | ७ | स्थापत्य अभियांत्रिकी सहायक | ४ |
| | | ८ | शिपाई | २ |
| | | ९ | चौकीदार | १ |
| | | १० | वाहनचालक | १ |
| | | | **एकूण** | **१८** |